92 सं.ग्रन्थ 158

# कर्मयोगी

# गोविंदभाईजी श्रॉफ

नागेश्वर. दि.देशमुख



॥ विद्या विनयेन शोभते ॥

# कर्मयोगी

# गोविंदभाईजी श्रॉफ

नागेश्वर. दि. देशमुख

लेखक :-

नागेश्वर दि. देशमुख
एन १२ एच ७० हडको,
औरंगाबाद.

प्रकाशक :

सौ. उषा नागेश्वर देशमुख
एन १२ एच ७० हडको,
औरंगाबाद.

अभिजीत प्रकाशन औरंगाबाद.

प्रती - १०००.
किंमत रुपये : ३२.००

मुद्रण : छपाई

साई ऑफसेट
समर्थनगर,
औरंगाबाद.

दिनांक १५ ऑगष्ट १९९७.

# लेखकाचे मनोगत

मराठवाड्याचे जेष्ठ, श्रेष्ठ आणि स्वातंत्र्य मिळविण्याकरीता ज्यांनी जीवाची पर्वा केली नाही. शिक्षणातून स्वातंत्र्य कसे मिळविता येईल हे ज्या व्यक्तीने केले. ती व्यक्ती म्हणजे स्वातंत्र्य सेनानी गोविंदभाई हे होत. त्यांच्या बद्दल मराठवाड्यातच नव्हे, तर संपूर्ण भारतात त्यांना ओळखणारे सुजाण, सुशिक्षित नागरिक आजही आहेत एवढेच नव्हे तर संपूर्ण साक्षर आणि निरक्षर लोकही खेड्यापाड्यातून ओळखतात. १९३८ ते १९४८ पर्यंत त्यांनी हैद्राबाद मुक्ति संग्रामाचे नेतृत्व केले. एकदा नव्हे तर अनेतदा कारावास भोगला. महात्मा गांधीजींनी वन्दे मातरम्, चलेजाव ही चळवळ सुरु केली. त्याचे पडसाद मराठवाड्यातील कानाकोपऱ्यातून निनादू लागले होते, त्यावेळी मराठवाड्यात रझाकारांचे राज्य होते. त्यांच्या विरुध्द लढा देण्याचे धाडस त्यांनी केले. त्यांच्या प्रेरणेने अनेक त्यावेळचे तरुण स्वंयस्फूर्तीने भाग घेत गेले. रझाकार आणि इंग्रज यांना शरणागतीच नव्हे तर नामोहरण करण्याचे ठरविले. त्यात त्यांना यश आले. रझाकार म्हणजे गरीब् जनतेला छळणारे होते. गरीबांच्या कष्टाच्या पैशाचे मालक बनत असत. एवढेच नव्हे तर अत्याचार, दहशदवाद निर्माण करुन त्यांची ते पिळवणूक करीत होते. मराठवाड्यातील जनतेला त्यांच्या विरुध्द लढा देण्याकरीता श्री गोविंदभाईंनी पुढाकार घेतला. नांदेड, परभणी, औरंगाबाद, बीड, लातूर, जालना उस्मानाबाद ह्या ठिकाणी असलेल्या रझाकाराविरुध्द तेथील जनतेने लढा देऊन प्राणार्पण केले. मात्र रझाकारांना पळता भूई थोडी केली. एवढेच नव्हे तर दे माय धरणी ठाय करुन सोडले. अनेक रझाकारांना प्राण गमवावे लागले. जे कांही उरले होते, त्यांनी कांही ठिकाणी लपण्याचा सपाटा लावला. श्री गोविंदभाईनी स्वामी रामानंद तीर्थ, आ. कृ. वाघमारे, बाबासाहेब पराजंपे, विनायकरावजी, चारठाणकर, श्रीनिवासराव, बोरीकर, द. रा. मेढेकर, काबराजी, आशाताई वाघमारे, पु. बा. जोशी अशा निःस्वार्थी आणि मुक्ती संग्रामात कार्य करण्याची मैत्री केली. अर्थात हेही लोक भाईंना आपल्या परिवारातील जेष्ठ आणि श्रेष्ठ व्यक्ती समजत गेले. कै. अनंतराव भालेराव यांनी तर आपल्या मराठवाड्याच्या

अग्रलेखातून अनेक गोष्टीवर, काळया कृत्यावर प्रकाश टाकला. त्यांच्या सारखे अनेक कार्यकर्ते कारावास भोगण्यास तयार झाले.

श्री गोविंदभाईनी स्वातंत्र्य मिळाल्यानंतर महाराष्ट्रात विलीन होण्याकरीता आपली सम्मती दर्शविली. परंतु मराठवाड्याची विकासाची कोणतीही चिन्हे न दिसल्यामुळे मराठवाडा विकास आंदोलन सुरु केले. मराठवाड्याचे अनेक प्रश्न पुढे येत गेले. त्यासाठी श्री भाईंनी मराठवाडा विकास मंडळ स्थापन करण्यात आले. तत्पूर्वी मराठवाडयाच्या विकासाकरीता जो पैसा मिळणार होता तो बेचाळीस कोटी होता. तो फक्त अडीच कोटी मंजूर करण्यांत आला. त्यामुळे श्री गोविंदभाईंनी आपल्या कुशाग्र बुध्दीचा वापर करुन वैधानिक विकास महामंडळ, रेल्वेचा विकास, ब्रॉडगेज, लहान मोठी धरणे ह्यावर चर्चासत्र, मेळावे घेऊन मार्गी लावण्याचा प्रयत्न केला. आज अनेक गोष्टीची पूर्तता शासन करीत आहे. त्यापैकी वैधानिक विकास मंडळ स्थापन झाले आहे.

अशा ह्या कर्मयोगी, तत्वनिष्ठ, जिद्दी आणि समयसुचक व्यक्ती बद्दल आपला आदर कसा व्यक्त करावा. हे बऱ्याच दिवसापासून नव्हे तर वर्षापासून डोक्यात विचारांचे चक्र फिरत होते.

स्वातंत्र्य मिळून पन्नास वर्ष झाल्यामुळे, आणि संपूर्ण महोत्सवाचे कार्यक्रम होत असल्याचे दिसून आले. परंतु एक गोष्ट मला जाणवली ती म्हणजे ह्या महान नेत्याबद्दल कां व कुणी चरित्र प्रसिध्द करु नये. हे चरित्र आजच्या नव तरुणांना, विद्यार्थ्यांना समजेल अशाच प्रकारे लिहिले आहे. श्री गोविंदभाईची प्रेरणा ही सर्वांच्या पाठीशी आहेच. त्यांच्या बद्दल आदर व्यक्त करण्याचा हा खटाटोप होय.

" स्वातंत्र्यासाठी झगडणारे, बलिदान देणारे थोर नेते, महात्म्ये होऊन गेले." आज औरंगाबाद येथे लोकमान्य बाळ गंगाधरराव टिळक यांची आठवण सदोदित डोळ्यापुढे रहाते, ती म्हणजे "बलवंत मोफत वाचनालय" हे त्यांचे स्मृती गृह म्हणावे लागेल. इंग्रजाचे राज्य जावे, स्वाराज्य यावे, निझामाचे राज्य जाऊन हैद्राबाद भारताचा भाग बनावा. हे उद्दिष्ठ पूर्ण झाले हा आम्हाला अभिमान आहे. महिलामध्ये आशा ताई वाघमारे यांची सदोदित आठवण होते ती एका गोष्टी वरुन त्या नेहमी म्हणत असत गोविंद आणि गोपाळ ही जोडी म्हणजे एक योगायोगच होय. त्यांनी आंनद कृष्ण वाघमारे यांच्याशी विवाह करुन संसार आणि स्वातंत्र्य, महिलांना मुक्त वातावरणात व वावरण्याची संधी प्राप्त करुन दिली.

हैद्राबाद मुक्ति संग्रमात अनेक स्त्रिया, दलित यांचाही समावेश होता. त्यांनी ह्या देशकार्याला वाहून घेतले. श्री. गोविंदभाई आणि बाबासाहेब परांजपे हे दोघे मराठवाड्याच्या सार्वजनिक जीवनाचे पालकच म्हणावे लागतील.

श्री स्वामी रामानंद तीर्थ, श्री गोविंदभाई अनंतराव भालेराव, आ. कृ. वाघमारे, ज. रा. बर्दापूरकर अशा अनेक व्यकित एकत्र येऊन सर्वधर्मसमभाव, बंधू प्रेमाला त्यांनी जोपसले वाढविले. हैद्राबाद मुक्तिसंग्रामात ज्यांनी उडी घेऊन स्वातंत्र्य मिळविले. पोलीस कारवाई, झाल्यानंतर मुक्तिसंग्राम संपुष्टात आला. हैद्राबाद संस्थानचा पिवळा डाग गेला. हैद्राबादचा नकाशा निजामाशाही मध्ये फार प्रसिध्द होता. त्या काळच्या विद्यार्थ्यांना हैद्राबाद संस्थान आणि इलाखा म्हणजे विभाग शिकविला जात असे. हैद्राबाद हा भाग पिवळ्या रंगाने भरलेला होता. मराठवाड्यातील स्वातंत्र्यसैनिकांनी मराठवाड्यातच नव्हे तर संपूर्ण भारत स्वतंत्र व्हावा म्हणून भारतीय राजकीय पुढाऱ्याच्या खांद्याला खांदा लावून लढा दिला. स्वंतत्र भारताला आर्थिक सामाजिक विकास घडवून या देशाला आधुनिक बनवणे हे अंतिम उद्दिष्ट साध्य झाले. कॉं. श्रीपाद अमृत डांगे, श्री एस. एम. जोशी, तसेच नानासाहेब गोरे ह्या महान व्यक्तिंनी स्वातंत्र्यासाठी जे कार्य केले ते कुणीही विसरु शकणार नाही.

श्री गोविंदभाई बद्दल लिहिण्याचे धाडस करण्याचा माझ्या मनाने उचल खाल्ली आणि हे चरित्र सर्वांच्या सहकार्याने लिहिले. ह्यामध्ये अनेक मान्यवरांचा समावेश आहे. श्री गोविंदभाईंचे चरित्र लिहित आहे असे कांही व्यक्तिंना समजले तेंव्हा त्यांनी कौतुक केले हे मी कधीही विसरणार नाही.

स्वातंत्र्याला १५ ऑगष्ट १९९७ ला पूर्ण ५० वर्षे झाल्यामुळे महाराष्ट्रात विविध ठिकाणी सुवर्ण महोत्सव साजरा होत आहे. ज्यांनी स्वातंत्र्य मिळविण्यासाठी धडपड केली, त्यांना जो आनंद होत आहे, तो वेगळाच म्हणावा लागेल. महाराष्ट्र शासनाने स्वातंत्र्य सैनिकांचा मान सन्मान करण्याचे ठरविले आहे.

कर्मयोगी ही पदवी नसून त्यांनी जे विविध कार्य केले आहे. त्याची आठवण ह्या एका शब्दात व्यक्त होऊ शकते.

श्री गोविंदभाईच्या विचाराने अनेक जण भारावून गेलेले असतात. हे प्रत्यक्षपणे

अनुभलले आहे. त्यांचे विचार ऐकणारे, मनन, चिंतन करणारे बोटावर मोजण्याइतकेच दिसून येतील. त्यांना जी अपेक्षा असते ती ते आपल्या भाषणातून, मुलाखतीतून सांगण्याचे प्रयत्न करीत असतात.

श्री गोविंदभाई जेव्हा जेव्हा मराठवाडा आणि महाराष्ट्रात, भारताच्या राजधानीत जातात, तेव्हा अनेकजन त्यांना पहाण्याकरीता उत्सुक असतात. त्यांनी मांडलेले विचार म्हणजे मौलिक व्यक्तिमत्वाची छाप पडलेली दिसत असते.

श्री गोविंदभाईंच्या गुणांचे मोजमाप कुणीही करु शकणार नाही. अनेक बिकट प्रसंगाना तोंड देण्याचे धैर्य, इतराच्या दुःखात सहभागी होऊन झालेल्या गोष्टीबद्दल " अगा कांही घडलेचि नाही " असे ते भासवीतात दैनिक मराठवाड्याचे संपादक स्व. अनंतराव भालेराव यांनी आपल्या " मांदियाळी" ह्या पुस्तकातून श्री गोविंदभाई बद्दल तत्वनिष्ठ पदवी बहाल केली आहे. श्री अनंतराव भालेराव आणि श्री गोविंदभाई यांना शिक्षण कोणाला द्यावे, हे त्यांना माहित होते. अनेकांना त्यांनी कार्यक्रमाची रुपरेषा ठरवून दिली होती. हैद्राबाद मुक्तिसंग्रातील हे आपआपसात भांडणे, हेवेदावे ह्याच्याकरीता नव्हते. कुणी कुणाचे पाय ओढीत नसत. ही परिस्थिती आजच्या घटकेला होत असल्याचे दुःख श्री गोविंदभाईना सदोदित होत असते. पाणी प्रश्न, विकासाची गती, अनुशेष ह्या गोष्टी भेडसावीत असतात.

श्री गोविंदभाई हे सर्वांना पुढील मार्ग मोकळा करुन देतात, त्यांच्या बरोबरने, खाद्यांला खांदा लावून काम करणारे जेंव्हा गेले तेंव्हा त्यांनी धीर गंभीर होऊन झालेले दुःख दूर सारून ते त्यांच्या नेतावाईकांना धीर देण्याचे कार्य मोठ्या हुशारीने आणि धैर्याने सांत्वन करीत असतात. अशा ह्या महान व्यक्तिबद्दल लिहिण्याचे कार्य माझ्या हातून घडत आहे हे मी माझे भाग्य समजतो. त्यांच्यामधील " ठेविले अनंते तैसेचि रहावे " हे नसून प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलही गळे" असे म्हणावे लागेल.

सर्व धर्म समभाव, बंधुत्व, एकता सर्वामध्ये जागृत राहो हीच सदिच्छा.

लेखक

नागेश्वर दि. देशमुख

# प्रस्तावना

आधुनिक मराठवाड्याचे शिल्पकार कर्मयोगी पद्मम्विभूषण गोविंदभाई श्रॉफ यांचे हे श्री नागेश्वर देशमुख यांनी लिहिलेले चरित्र अनेक दृष्टीने स्वागतार्ह आहे. विशेषत : बाळ गोपाळांना म्हणजे शालेय विद्यार्थ्यांना हे चरित्र निश्चितपणे नवीन संदर्भात प्रेरणा देणारे असे आहे. ''साधी राहणी व उच्च विचारसरणी'' हे भाईजींच्या जीवनाचे मुख्य सूत्र आहे. मार्क्सवाद आणि गांधीवादाचा अनुपम असा मनोज्ञ संगम त्यांच्या व्यक्तिमत्वात प्रकटलेला दिसतो. आदरणीय स्वामी रामानंद तीर्थ यांच्या परिस स्पर्शाने भाईजींचे जीवन पावन झाले. त्यांनी हैद्राबाद मुक्ती संग्रमांत जसा हिरहिरीने भाग घेतला तसा आधुनिक मराठवाड्याच्या उभारणीतही रचनात्मक सहभाग दिला त्यामुळे मागास मराठवाडा विभागाचा संपूर्ण कायापालट होऊन या विभागाचे चित्र संपूर्णपणे पालटलेले दिसते.

स्वातंत्र्य, समता, बंधुता, आणि सामाजिक न्याय ही भारतीय संविधानामधील मूलतत्वे भाईंनी आपला जीवनकार्यात प्राणपणाने अनुसरली आहेत. सामाजिक आणि आर्थिक विकासातून मराठवाड्याचे चित्र पालटण्याचा त्यांचा निर्धार आता कृतीमध्ये आला आहे. महाराष्ट्रातील विविध विभागामध्ये असलेला प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी नेमलेल्या डॉ. दांडेकर समितीचा अहवाल म्हणजे भाईजींच्या समग्र संघर्षाची पावती होय. भाईंजींनी जर एवढा निरंतर व अखंड संघर्ष केला नसता तर आज वैधानिक विकास मंडळाची स्थापना झाली नसती. १३ व्या शतकापासून मराठवाडा विभागात जो अंध: कार पसरला होता तो दूर करण्याचे भाईजींचे प्रयत्न त्यामुळे युगप्रवर्तक ठरतात.

भाईंचे जीवनगाणे हे तत्त्वनिष्ठेचे आहे. मूल्याधिष्ठीत सिध्दांताचे सत्तेऐवजी त्याग पदाऐवजी साधेपणाची तत्त्वे प्रभावीपणे जोपासली. प. पू. स्वामी रामानंद तीर्थ यांचे सत्व, स्वत्व आणि तत्व त्यांनी जसे जीवन प्रवाह मध्ये प्रतिबिबित केले तसे कोणीही केले नाही !

भाईजींच्या जीवनातील प्रत्येक क्षण हा दुसऱ्यासाठी जगण्याचा क्षण आहे त्यांनी कष्ट, स्वावलंबन आणि साधेपणा या सद्‌गुणांची पूजा बांधून जीवनशिल्प कोरले आहे. टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाही, असं म्हणतात तसं भाईंनी अत्यंत प्रतिकूल परिस्थितीवर मात करुन मराठवाडा विभागात प्रकाशदायी नेतृत्व दिले आहे. मराठवाडा आणि गोविंद्‌भाई हे जणू एक समीकरण बनले आहे. त्याचे कारण असे की मराठवाड्याचा माती मधले विकासाचे प्रश्न त्यांनी जसे समजून घेतले तसे अन्य कोणालाही कळले नाही. विद्यार्थी दशेपासून त्यांनी राजकरणात भाग घेतला आणि तसेच त्यामुळे पुढे चालून ते सेवादृष्टीने शिक्षण क्षेत्राकडे वळले. परंतु चार दिवारीत त्यांचे मन रमले नाही त्यांचा खरा पिंड हा समाज सेवकाचा असल्याने ''सेवा हाच धर्म'' मानून त्यांनी रात्रंदिवस आम्हा

युध्दाचा प्रसंग प्रसंग या वचनाप्रमाणे त्यांनी संघर्ष ठेवला. मार्क्सवादी असूनही भाईजी उत्कट मानवतावादी आहेत, सजग लोकशाहीवादी आहेत. चारित्र्याचा आग्रह धरणारे संस्कृतीचा संदेश सांगणारे साने गुरुजी सारखे प्रेमळ समाजवादी आहेत त्यांच्या आरंभीच्या संघर्ष मधील तेजस्वीता अद्यापही कायम आहे. कारण त्यांचा मूल्यनिग्रह अद्यापही कायम आहे त्यांच्या ध्येयवादात केवळ स्पप्नाळू वृत्ती नाही तर सम्यक कृती प्रेरणा देण्याचे सामर्थ्य आहे, हे सूत्र त्यांच्या चरित्रात ठायी ठायी जाणवते.

एक निस्पृह लोकनेता या नात्याने भाईजींचे जीवन लोक ध्येयधुंद सूर्यबिंबासारखे तेजस्वी बनले आहे. सामान्य माणसाला, लहानथोरांना स्फूर्ती देण्याचे सामर्थ्य त्यांच्या या चरित्रात आहे. "वंदे मातरम" चळवळ असो की साक्षरता अभियान असो भाईजींचे समान सूत्र आहे. ते म्हणजे समर्पणाचे होय ! शिक्षक, संपादक, कार्यकर्ता व नेता या विविध रुपामध्ये वावरतांना भाईजींनी आपले जीवनपुष्प विकसित केले आहे.

नदी जशी अखंडपणे वाहते तसे भाईजींचे जीवन निर्झरासारखे वाहत आहे. एका थोर विचारवंताची छाया त्यांच्या जीवन शिलावर उमटली आहे अशा या कर्मयोगी जीवनाचे प्रेरणा सामर्थ्य मराठवाड्यातील नव्या पिढीला देण्याचे नागेश्वर देशमुखांचे प्रयत्न स्वागतार्ह आहेत.

रचनात्मकदृष्टीने अव्याहतपणे सेवा करण्याचा त्यांचा मंत्र नव्या युगात तरुणाईला प्रेरणा देणारा आहे कायावाचा मने सेवा हेच आपले सर्वस्व मानणारे भाईजी हे त्यामुळे उभ्या मराठवाड्यास प्रेरणा देणारे आहेत. अभ्यासपूर्ण चिंतन आणि चिंतनशील कृती यामुळे भाईजी उभ्या महाराष्ट्राला वंदनीय आहेत पूजनीय आहेत, आदरणीय आहेत. त्यांचे चरित्र वाचून नव्या उत्साहाने कार्य करण्याची प्रेरणा लाभते. तरुणाईत पुन्हा नभाच्या लाल कडा दाखविणाऱ्या तेजःपुंज दीपस्तंभाचे अनेक पैलु देशमुखांनी सूक्ष्मपणे उलगडले आहेत.

" दिव्यत्वाची जेथ प्रचिती तेथे कर माझे जुळती "यात संदेह नाही.

श्री नागेश्वर देशमुख यांचा हा उपक्रम स्तुत्य म्हणावा लागेल.

डॉ. वि. ल. धारुरकर
१ जुलै १९९७
वृत्तविद्या विभाग
डॉ. बाबासाहेब आंबेडकर
मराठवाडा विद्यापीठ,
औरंगाबाद - ४३१ ००१.

# कर्मयोगी

## : पदम् विभूषण :

## श्री गोविंदभाईची दिनचर्या.

दररोज येणारे प्रत्येक वर्तमान पत्र वाचणे, त्यातील महत्वाचोमजकुराचा संग्रह करणे, समस्या, प्रश्न आणि जगातील घडामोडी बरोबर महाराष्ट्र, मराठवाड्यातील विकासात कोणत्या त्रुटी आहेत, शासनाच्या घोषणा, आश्वासने यांची कात्रणे विपुल जमविण्याचा छंद आणि त्यातील सत्यता पडताळणे.

थोडासा अल्पोपहार करुन श्री भाई श्री सरस्वती भुवन शिक्षण संस्थेच्या आपल्या कार्यालयात येतात. गेल्या कांही वर्षातच भाईसाहेब गाडीतून प्रवास करीत असले तरी १९२५ पासून महात्मा गांधीजीच्या सूत्रानुसार आपली तत्वे अमलात आणीत आले आहेत. त्यात पायी चालणे हा महत्वाचा भाग म्हणावा लागेल. प्रत्येक गोष्ट विचार पूर्वक करण्यात ते सार्थकता समजत आलेले आहेत. कोणताही कार्यक्रम असलात तरी श्री भाई पायी चालत जात असत. आज त्यांच्या वयाला ८७ वर्ष पूर्ण झाली तरी त्यांच्या कामात तोच तजेलपणा दिसून येतो. जो पूर्वी च्या काळी होता.

गांधी वादी विचाराने ते झपाटले गेले असल्यामुळे खादीचे कपडे ते आजही तेवढ्याच आवडीने घालीत असतात. निष्टावंत ज्याला आपण म्हणतो ते गुण त्यांच्या अंगी आजही दिसून येतात. श्री गोविंदभाईनीं खादी ग्रामोद्योग चालवले होते. त्यांनी सूत कताई साठी अनेक चरखे कार्यकर्त्यांना दिले होते. एकीकडे खादीचे महत्व तर

दुसरीकडे देशभक्तीचे बोधामृत पाजण्यात त्यांनी महत्वाचे कार्य केले होते. सूत कताईमुळे लोकांना पैसा मिळत असे. सामान्य माणूस हा स्वच्छ कापसाची कताई करुन सूत तयार करीत असे. त्याच्यावर त्याचा उदरनिर्वाह चालत असे.

श्री. गोविंदभाईंना अनेक पदव्या मिळत गेल्या. याचे कारण त्यांची चिकाटी, जिद्द, उत्साही वृत्ती, निःसंकोच पणा, समोर येणाऱ्या प्रत्येक व्यक्तिशी बोलण्याची त्यांची पध्दत, ऐकून घेण्याची सवय, आपलेपणा, समयसुचकता, अशा एक नाही तर अनेक गोष्टी त्यांच्या सान्निद्यात कांही काळ, वेळ घालविण्यास दिसून येतात.

श्री. गोविंदभाईंची उत्कंठा, तळमळ आणि समोरच्या व्यक्तींनी केलेल्या कार्याचा गौरव हा गुणधर्म मधमाशी प्रमाणे त्यांच्या अंगी चिकटलेला आहे असे म्हणावे लागले. श्री सरस्वती भुवन परिसरात येणारा प्रत्येक जण त्यांना पाहून सरस्वती मंदिरात रमलेला दिसतो हा परिसर म्हणजे "जो जे वांच्छिले तो ते लाहो प्राणिजात असे म्हणावे लागले."

श्री भाईनी सरस्वती भुवनच्या हीरक महोत्सव प्रसंगी व्यासंगी चित्रकारांचे चित्रप्रदर्शन भरविले. संगीत, नाट्य, साहित्य क्षेत्रातील मंडळीचा त्यांनी मानसन्मान केला. आजही त्या लोकांनी स्मृतीचिन्हे पाहिले तर श्री स. भु. आणि गोविंदभाई हेच दिसत असतील ह्यात तीळमात्र शंका नाही. अनेक सृमतीचिन्हे देता आली असती परंतु सरस्वतीचे चित्र देण्यामागील उद्देश त्यांचा हाच होता की, सरस्वती म्हणजे विद्या, शिक्षण, ज्यामुळे माणसातील माणूसपण सदैव जागृत रहात असते. श्री गोविंदभाई यांनी कलाकारांचा गौरव करून संस्थेमधील अनेक कलाकारांना, चित्रकारकांना प्रोत्साहन दिले.

साहित्यकारांचा, शिक्षणतज्ञांचा सत्कार करुन साहित्य प्रेमी यांना आपणही कांही करावे ही प्रेरणा दिली. त्यामुळे स. भु. परिसर फुलून गेला.

पद्मविभूषण श्री गोविंदभाई यांचे ठळक वैशिष्ठ्ये आणि गुण : श्री. गोविंदभाई यांना आशिक्षिता पासून सुशिक्षीतापर्यंत, गरीब पासून श्रीमंतापर्यंत, कामगारांपासून अधिकारीवर्गापर्यंत, राज्य शासन आणि केंद्र शासनातील मंत्री, आमदार, खासदार, पुढारी, शिक्षण प्रेमी ओळखतात. श्री गोविंदभाई यांचा मूळ स्वभाव विचार करणारा म्हणावा लागेल, " पानी तेरा रंग कैसा, जिसमें मिलाया वैसा" अशातला होय. धीरो दात्त, खंबीर पणा, एकाग्रता, शिस्तप्रिय, हे गुण त्यांच्या अंगी आजही दिसून येतात. ते जरी गणित आणि विज्ञानातील पदवीधर असले तरी इतर विषयांचा त्यांचा अभ्यास दांडगा आहे. आजही ते तुम्ही कोणताही प्रश्न त्यांच्या पुढे नेला तर ते त्यांचा उलगडा करून सांगू शकतात. त्यांच्या कडून अनेक कामे घडली ती त्यांच्या बुध्दिमत्तेमुळेच म्हणावी लागतील. श्री सरस्वती भुवन शिक्षण संस्था म्हणजे त्यांनी त्यांच्या कल्पनेतून चितारलेली वास्तू आजही मोठ्या डौलाने तीळा तीळाने क्षणाक्षणाला वाढतांना दिसत आहे. क्रांतीकार-काचा पिंड तर शास्त्रज्ञाची वैचारिक पातळी त्यांच्या अंगी बाणली गेली. भारतातील प्रत्येक राज्या राज्यातून घडणाऱ्या घटनांचा पुरेपूर अभ्यास केला होता. अणूरेणू पासून पाण्याची काटकसर पर्यंतचा अभ्यास त्यांनी अवगत केला.

स्वतः शिक्षक म्हणून कार्य केल्यामुळे शिक्षणातील शिक्षकातील गुण अवगुण, दोष दूर करण्यांत त्यांनी प्राविण्य मिळवले. मराठवाड्यातील नव्हे तर संपूर्ण महाराष्ट्रातील शिक्षण संस्था श्री

गोविंदभाईंनी ठरवून दिलेल्या सुत्राप्रमाणे कार्य करीत असतात.

शिक्षण संस्थाची संघटना राज्य पातळीवर कार्य असून श्री गोविंदभाईनी आपले योगदान दिले आहे.. आज अनेक शिक्षण संस्था शासनाकडून अनुदान मिळविण्यात यशस्वी झाल्या आहेत.

सरदार वल्लभभाई पटेल सारखे पोलादी पुरुष त्यांच्या भेटीला उत्सूक झालेले होते. म्हणजे श्री गोविंदभाई सामान्य माणूस नाहीत हे सिध्द होते. अनेक मुख्यमंत्री, पंतप्रधान, त्यांना भेटले आणि आजही ते भेटतच असतात. श्री गोविंदभाईना भेटणारी व्यक्ती त्यांच्या विचाराची शिदोरी बरोबर असावी त्याचा आपल्याला आयुष्यात कोठेना कोठे उपयोग व्हावा म्हणून धडपडत असतात. श्री गोविंदभाई सत्ता संपादन करु शकले नाही. त्याचे कारण म्हणजे कोणत्याही प्रलोभनाला ते बळी पडण्यास तयार नव्हते. श्री. कर्वे गुरुजी सारखें श्रध्दाळू प्रेमळ,स्वभावाची माणसे मिळत गेली. आजच्या परिस्थितीत प्रेम, माया ह्या दोन्ही गोष्टी क्वचितच दिसतात. प्रेम किंवा माया ह्या दोन गोष्टी अंगी उपजातच असाव्या लागता. आज अेक नव्हे तर अनेक लोक स्वतः कांहीही करु शकत नाहीत परंतु इतराचें पाय ओढीत असतात. तुमची इच्छा दडपून टाकण्यांत पटाईत असतात. तसे गोविंदभाईच्या स्वभावात नाही. उलट तुम्ही जे कांही कार्य केले आहे त्यावर आणखी विचार करण्यांचेच ते सांगतात. मग तो कृषितज्ञ असो नाही तर शिक्षण तज्ञ असो. शिक्षक व ा मुख्यध्यापक असो, मंत्री असो नाही तर अधिकारी असो. त्यांचा सल्ला हाच राहणार की, तुम्ही जे कांही केले आहे. त्याचा आणखी पुढे नेण्याचा प्रयत्न करा.

त्यांच्यातील एक गुण म्हणजे सर्वांना सारखेच समजून चला. भेदभाव करणे हे त्यांच्या कोषातच नाही असे म्हणावे लागले. स्व.

इंदिरा गांधीजीनी स्वातंत्र्य सैनिकाच्या गौरव कार्यक्रमास बोलावले होते. परंतु त्यांनी ते नाकारले. त्यांनी ह्या टिकाणी भेदभाव होत असल्याचे जाणले होते.

१८ जानेवारी १९९२ रोजी मा. श्री. पी. व्ही नरसिंहरावजी यांच्या हस्ते सत्कार करण्यांत आला.

मा. श्री. गोविंदभाई यांचा साक्षरता अभियानाचे कार्य हाती घेतले. त्यामुळे अनेक निरक्षर लोक साक्षर होत गेले. आज जे निरक्षर होते, साक्षर होऊन चौथीचे परिक्षा देऊ शकले आहेत. त्यात उत्तीर्ण ही झाले. स्वातंत्र्य चळवळी इतकीच साक्षरता अभियान चळवळ ते आजपर्यंत मानीत आले आहेत.

मा. श्री गोविंदभाई यांना अनेक पुरस्कार मिळाले आहेत त्यांचा विचार केल्यास त्यांचातील कर्म करण्याची जिद्द दिसून येऊ शकते. पेराल ते उगवेल, कर्म करीत रहा. फलाची आशा करु नका. जर आशा कराल तर तुमचे पाऊल जागचे हलू शकणार नाही.

श्री गोविंदभाईंनी अनेक संताच्या सानिध्यात राहून त्यांच्या ठळक वैशिष्ट्यांचा सर्वधर्मसमभावाचा अभ्यास केला. श्री विनोबा भावे हे भूदान यज्ञाचे जनक म्हणावे लागतील, त्यामुळे श्री गोविंदभाईंना भूदानाच्या चळवळीतून जे कांही दिसून आले त्याचा त्यांनी अभ्यास केला.

श्री गोविंदभाईंनी आजही साक्षरता अभियानाची चिंता असून ज्या ठिकाणी ते कार्य चालू आहे. त्याचा ते अहवाल तर मागवित असतातच त्याच बरोबर त्यात सहभागी असणाऱ्या व्यक्तिंना जिद्दीने नेटाने कार्य करण्याकरीता चेतावणी, प्रेरणा देत असतात. आज ह्या

अभियानात अनेक कार्यकर्ते कार्य करीत आहे. ''साक्षरता अभियान हे कार्य ज्ञान संवर्धन करणारे तर म्हणावेच लागेल, त्यातून ते उपजीविका चालविण्याचे साधन होय.

असे कर्मयोगी श्री गोविंदभाईच्या कार्याचा सर्वांना परिचय आहेत, तरीही उजळणी म्हणून हा खटाटोप होय. मा.श्री गोविंदभाईंच्या गुणांचा कुणी कसा उपयोग करुन घ्यावयचा हे ज्याचे त्याने ठरवून त्यांच्या सल्ल्यानुसार पाऊल टाकण्याचे प्रयत्न यशस्वी करावेत.

## मा. गोविंदभाई यांच्या जीवनातील घडलेल्या घटना

श्री. गोविंदभाईचा जन्म २४ जुलै १९११ मध्ये झाला. त्यांचे संपूर्ण नांव श्री. गोविंददास मन्नुलाल श्रॉफ त्यांचे जन्म गांव कनार्टकातील विजापूर हे होय.

त्यांच्या जीवनाताल महत्वाचे टप्पे खालील प्रमाणे म्हणावे लागतील.

१) १९१६ साली त्यांच्या वडिलाचे निधन.

२) १९२७ मध्ये चादर घाट येथे मॅट्रिक पर्यंत शिक्षण

३) १९३० साली इंटरमिजिएट परिक्षा उत्तीर्ण निजाम कॉलेज प्रथम श्रेणीत प्राविण्यासह

४) १९३०-३१ शिक्षण सोडून राजकीय चळवळीत प्रवेश स्वातंत्र्य मिळविण्याचा ध्यास, ह्या चळवळीतून नवजीवन संघात कार्य सूरु केले.

५) १९३१ मध्ये सुरत जिल्ह्यात ओळपाड तालुक्यात सामाजिक कार्याला सुरवात. मुंबई ते ठाणे पदयात्रा काढली.

६) १९३३ बी. एसस्सी (ऑनर्स) गणित परिक्षा.

बी कॉम होत असतांत स्वामी विवेकानंदाचे भाऊ यांच्याशी त्यांचा संबंध आला. त्यामुळे सशस्त्र क्रांती करण्यास प्रेरणा.

म. गांधईजीच्या प्रेरणेमुळे सत्याग्रहात उडी घेण्याचे ठरविले.

१९३५ मध्ये पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालतून एम. एस.स्सी (ॲप्लाईड मॅथेमॅटीक्स) उत्तीर्ण.

## गणेशोत्सव सुरवात.

१९३६ एल. एल. बी. उत्तीर्ण.

डॉ. सत्याबेन यांच्याशी विवाह सत्याबेन ह्या इंटरमिजिएट उत्तीर्ण झाल्या. त्यांनी विवाहानंतर आग्रा येथे एल सी. पी. एस हा वैद्यकीय अभ्यासक्रम पूर्ण केला. आणि डॉक्टर बनल्या.

१९३७ मध्ये महाराष्ट्र परिषदेचे आधिवशन

१९३८ हैद्राबाद येथे सत्याग्रह.

'वन्दे मातरम् ' चळवळ. विद्यार्थ्यांचा शाळा कॉलेजवर बहिष्कार.

१९३९-४० औरंगाबादच्या श्रीसरस्वती भुवन विद्यालयाचा अर्धवर्तळाकार इमारतीच्या कामाला सुरवात.

डिंसेबर १९४० मध्ये राजकीय कार्याकाळ अटक, व हर्सूल जेल, त्यांनतर बीदर जेमध्ये तुरंगवास, २२ महिने १९४२ मध्ये सुटका.

म. गांधीचं चले जाव आंदोलन.

९ ऑगस्ट १९४२ ला सुरु झाले.

स्वामीजीचा पुरोगामी दृष्टिकोन.

१९३९-४५ महाराष्ट्र परिषदेची विविध ठिकाणी अधिवेशने झाली.

१९४४ मध्ये उदयपूर येथे स्टेट पिपल्स कॉन्फरन्स झाली. अनेक मान्यवराचे मार्गदर्शन.

१९४५-४७ दुसरे जागतिक महायुध्द.

१९४७- १५ ऑगष्ट १९४७ ला भारताला स्वातंत्र्य मिळाले.

संस्थानातील मंडळीनी ॲक्शन कमिट्या स्थापन केल्या. अध्यक्ष श्री दिंगबरराव बिंदू, चिटणीस प्राणेशाची, गोविंदभाई, भाऊसाहेब वैशंपायन, डॉ. मेलकोटे, आ. कृ, वाघमारे, बाबासाहेब पराजंपे, यांचाही सहभाग होता. म. गांधीजीची दिल्ली येथे भेट.

१९४८ स्वामी रामानंद तीर्थ स्टेट कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले.

१९४८ मध्ये १३ ते १७ सप्टेंबर पोलिस ॲक्शनच्या वेळी श्री गोविंद भाई, वैशंपायन हे होते. ॲक्शननंतर पं. ज़वाहरलालजी नेहरु यांची दिल्ली येथे भेट.

१९५० मध्ये स्टेट कॉंग्रेसचा श्री गोविंदभाईंनी त्याग केला.

१९५२ लीग ऑफ सोशालिस्ट वर्कर्स ची स्थापना.

१९५३ ते १९५६ हैद्राबाद येथे कॉंग्रेसचे अधिवेशन.

१९५६ मध्ये द्विभाषिक मुंबई राज्य अस्तित्वात आले. त्यामुळे मराठी भाषिक जनतेत प्रशोभाचे वातावरण १९५२ मध्ये पहिली पंचवार्षिक योजना, मराठवाड्यासाठी अल्प तरतूद ह्या अनषंगाने अनेक मागण्या रेटल्या गेल्या. स्वतंत्र्य विद्यापीठाची मागणी करण्यात आली.

१९५६ : राज्य पुनर्रचना-मराठवाडा संयुक्त द्वैभाषिक मुंबई राज्यास जोडला गेला.

१९५७ : ना. यशवंतरावजी चव्हाण यांची भेट विद्यापीठ मागणी.

१९५८ : मराठवाडा विद्यापीठाची स्थापना.

## उद्‌घाटक : पं. जवाहरलालजी नेहरु

श्री. गोविंदभाई यांची सिनेट व कार्यकारिणीवर नियुक्ती.

त्यांच्या देशभक्तीची चाहूल दिसून आली. ती त्यांच्या सहकाऱ्या बरोबर चळवळईत समरस होऊन मुंबई येथे प्रयाण केले. त्यांच्यातील तारुण्याचा, उत्साह वाढत गेला. तेथे त्यांनी निदर्शने केली. ह्यातील तारुण्याचा, उत्साह वाढत गेला. तेथे त्यांनी निदर्शने केली. ह्यात ते कांही काळ कार्य करु शकले. पुढे कलकत्ता विश्वविद्यालयाची बी. एस. सी. ची १९३३ साली पदवी प्राप्त केली. त्यांच्या चातुर्य आणि तीक्ष्ण बुध्दीमुळे कायद्याची पदवीही सुलभतेने

मिळविली. एल. एल. बी. होणे हे त्याकाळी कठीण होते. एवढेच नव्हे तर मिडल, मॅट्रीक ह्या परिक्षा देण्या करीता सामान्य विद्यार्थ्यांना सहज शक्य होत नसे. कांही विद्यार्थी तर हैद्राबाद, कनार्टक ह्या राज्यात सोईनुसार शिक्षण घेथ असत. परंतु श्री गोविंदभाई चिकाटीने कार्य करून शिक्षणातही समरस होत गेले. राजकारण्याचा सहवास त्यांना मिळत गेला. हैद्राबाद संस्थानाबाद्दल चीड निर्माण झालेले अनेक स्वातंत्र्य सेनानी एकमेकांस मिळाले. त्यात प्रामुख्यांने खालील राजकीय कार्यकर्त्यांचा उल्लेख करणे मी उचित समजतो. सर्वश्री स्वामी रामानंद तीर्थ, श्री काशीनाथराव वैद्य, श्रीधरराव नाईक श्रई दिंगबरराव बिंदू, आनंद कृष्ण वाघमारे श्रीनिवासराव बोरीकर मुंकदरराव

पेडगांवकर हे होते.

ह्यासर्वांच्या वयाचा विचार केला तर कांही वयाने मोठे असले तरी विचाराने एकच होते असे दिसून येते. १९०४ मध्ये स्वामी रामानंद तीर्थ याचा जन्म झाला मुंकुंदरावांचा (          ) झाला. १८९१ मध्ये श्री काशीनाथराव वैद्य यांचा जन्म झाला. औरंगाबाद जवळील खंडोबाच्या सातारा हे त्यांचे जन्म गांव होय.

श्री. आनंद कृष्ण वाघमारे यांची गणना असमान्य पत्रकारात मोडली जात होती असे म्हटल्यास वावगे होणार नाही. मराठवाड्याकरीता मराठवाड्याच्या द्वारे आपल्या हक्काची जाणीव करुणा देणारे आनंदकाका त्यांनी आपल्या झुंजार वृत्तीने निजाम राजवट संपुष्टात आणली. पत्रकारितेचे ते महर्षि म्हटल्यास अतिशोक्ती होणार नाही. टिळकानंतर अनेक पत्रकार झाले त्यात ह्याचा उल्लेख केला जातो.

अशा ह्या देशभक्ताच्या विचारांच्या पंक्तीत श्री गोविंदभाईनी आपल्या विचारांना स्फूती व चालना मिळाली.

शिक्षण चालू असतांना राजकारणाचा व्यासंगही वाढतच गेला. समजावादी विचारसरणीचा सूक्ष्म अभ्यास करुन विचारांची देवणा घेवाण केली. शिक्षण पूर्ण होताच भाईनी चळवळीच्या अनुभवातून नवीन दृष्टीचा उपयोग करुन घेतला. ह्याचा परिणाम हा झाला की भाईनी औरंगाबाद येथे आल्यावर आपली विचार प्रणाली रुजविण्यास सुरवात केली. त्यावेळच्या तरुण विद्यांर्थ्यांना स्फूर्ती आणि प्रेरणा दिली. ज्या शाळेतून भाईना काढून टाकले होते त्याच शाळेत त्यांना अध्यापण कार्य करण्याची संधी प्राप्त झाली. त्याचवेळी शिक्षण आणि राजकीय चळवळ ह्या गोष्टी प्रामुख्याने विद्यार्थ्यांना समजावण्याचा त्यांनी प्रयत्न

करुन निझामशाही विरुध्द लढा उभारला.

त्यांच्या तल्लख बुध्दिमत्तेचे प्रतिक त्यांचे भव्य कपाळ, अंतःकरणाचा ठाव घेणारी त्यांची शोधक नजर, प्रथम दर्शनीच आपुलकी निर्माण करणारे व्यक्तिमत्व, त्यांच्या विचाराला चालणा देणारे ओठ, हालचालीवरुन दिसून येणारा करारीपणा आजही त्यांच्या सानिध्यात कांही वेळ घालविल्यास दिसून येतो. त्यांच्या बालपणाचे वर्णन करणारे अनेक वयोवृध्द पण ज्यांनीखरोखरच त्यांच्या बरोबर राहून त्यांच्या विचारांना अवगत केले ते धन्य म्हणावे लागतील. त्यांनी इतरांना आपल्या अनुभवाचा अनमोल ठेवा देऊन कृत कृत केले श्री श्री गोविंदभाईंना साधा वेष आजही शोभून दिसतो. राष्ट्रपतीची भेट असो नाही तर पंतप्रधानाची, त्याच प्रमाणे सामान्य माणसाची भेट घेणे असो त्यांनी आपल्या सुती कपड्यावरच दृढ निष्ठा असल्याचे दाखवून दिले. आजही भाईचा पोषाख सदरा, टोपी, धोतर, कोट, हातात लेदर बॅग अशा प्रकारे ते खादी वापरतांना दिसतात.

डॉ. म्हणून कार्य करणाऱ्या सौ. सत्यवती बाई ह्यांनी तर त्यांच्या राजकीय व सामाजिक कार्याबद्दल कोणत्याही प्रकारची कुरबुर किंवा मध्यस्ती करीत नसल्याचे दिसून आले आहे. त्यांच्याकडे आलेले पाहुणे मंडळीचा, मित्र, आप्तेष्ट याचे आदर पूर्ण भावाने स्वागत करण्यात त्यांचा आजही नाव लौकिक आहे.

हैद्राबादच्याराजकीय जीवनात क्रांती घडवून आणारा १९३८ चा सत्याग्रह सुर झाला होता, त्यावेळी सत्याग्रहाचे प्रवर्तक प. स्वामी रामानंद तीर्थ यांना पत्र लिहून आपली देशभक्ती, देशप्रेम आणि भावना व्यक्त केल्या त्यांनी पत्रात लिहिले होते की, ‘‘ जिथे बंदुकीच्या गोळ्या चालतील, तिथे मला पाठवा, या एका वाक्यावरुन त्यांच्या जीवनाचे

वैशिष्ठ व श्रेष्ठता दिसून येते. श्री श्री गोविंदभाईंनी आपल्या जीवनाला अशी कलाटणी दिली की, प्राणार्पण करण्याचीही तयारी ठेवली. अंधारात मार्गदर्शन करणाऱ्या ज्योतीचे जीवन अधिक उज्वल असते. हेच भाईच्या बाबतीत म्हणावे लागले. ध्येय साध्य करण्याचे मोल अमोल म्हणावे लागेल. ध्येय साध्य करण्याचे शिकावे तर त्यांच्या कार्यशैलितून, शांत वृत्तीतून त्यांना संपत्तीचा मोह-लोभ त्यांच्या जवळ फिरकला नाही. त्यांच्या जवळ संपत्ती संचय नसून विचारांचा संचय आणि लोकसंग्रह दिसून येतो. ते जर आपल्या बुद्धीचा, चातुर्याचा उपयोग धन दौलतीकरीता केला असता, तर सत्याग्रहाकडे, स्वातंत्र्य मिळण्याकरीता ते वळलेच नसते. स्वातंत्र्यासाठी लढा हेच ब्रीद त्यांनी उराशी बाळगले होते. ध्येयसाठी झगडण्याचा त्यांचा संकल्प त्यांनी पूर्ण केला. १९३६ पासून स्वामीजींनी राजकीय परिस्थितीवर मात करण्यासाठी मृर्तस्वरुप दिले. १९३७ मध्ये परतूर येथे भरलेले महाराष्ट्र परिषदेच्या अधिवेशनात सर्वस्वी जबाबदारी स्वामीजींनी स्वीकारली होती. स्वातंत्र्य प्राप्ती धूंद ज्यांच्या डोळ्यावर होती. अशी ही माणसे तेथे पुढे आली. १९३८ मध्ये स्टेट कॉंग्रेस आंदोलनात त्यांनी धडाधडीने भाग घेतला.

श्री गोविंदभाई हे विद्यार्थी दशेत ज्या ध्येयाने प्रेरित झाले होते, त्याच प्रकारे त्यांनी शिक्षण दानातून विद्यांर्थ्यांना जिज्ञासा, आत्मियता, कळकळ अशा अनेक गोष्टीमुळे आकर्षूण घेतले. त्याची लोक प्रियता वाढत गेली. त्यांच्या ह्या प्रेरणेमुळे स्फूर्तीमुळे प्रत्येक शब्द पाळणारे विद्यार्थी पुढे येत गेले.

श्री गोविंदभाईना छंद कशाचा होता हे खालील गोष्टीवरुन दिसून येतो. वकृत्व मंडळे, स्टडी सर्कलर्स, समाजसेवा, प्रबोधन इत्यादी

मार्गाने विद्यार्थ्यात जागृती निर्माण होत गेली. एका वक्तृत्व मंडळात त्यांनी विद्यार्थ्यांना उद्देशून एक वाक्य म्हटले ते म्हणजे, ''मी ठिणगी तर टाकली आहे, बघु या काय होते. त्यांनी वंदे मातरम्च्या संपात, सत्याग्रहाच्या चळवळीत तरुण विद्यार्थ्यांना आकर्षून घेतली. खाद्यावंर खादी टोपी टाकून जात असलेल्या विद्यार्थ्यांवर त्यांनी थाप मारून त्यांच्यातील आपुलकीची भावना असल्याचे दाखविण्याचे कमी केले नाहीं. त्यांनी १९३९ साली सत्याग्रह शिक्षा केल्यामुळे त्यांना दोन वर्षाची शिक्षा झाली. त्यांनंतर सुटका झाल्यावर महाराष्ट्र परिषदेच्या कार्यावर भर दिला. त्यांनी अविश्रांत परिश्रम केले. त्यामुळे प्रचार परिषदेला लाभले गेले.

श्री गोविंदभाई ह्यांनी एखादे काम हाती घेतले तर ते पूर्ण केल्याशिवाय जेवण घेत नसत. तीच परिस्थिती आज आहे. सरस्वती भुवन शिक्षण संस्थेत त्यांनी सरचिटणीस पद भुषविले आणि आज ते अध्यक्ष म्हणून कार्य करीत आहे. माणसाने सदोदित कार्यरत रहावे हे त्यांनी स्वतःच्या कृतितून इतरांनांही दाखवून दिले आहे. आजही अनेक सहकारी, त्यांना मानणारे व्यक्तींनी त्याच्या कार्याचा गुण गौरव तर केलाच आहे. त्याच प्रमाणे त्यांच्या कडून सतत कार्य करण्याची प्रेरणा मिळविलेली आहे. त्यांच्या मध्ये असलेल्या अनेक गुणांमध्ये हा एक गुण दिसून येतो तो म्हणजे, केवळ व्याख्यान बाजी अथवा पोकळ चर्चा त्यांना मुळीच आवडत नाही. हे आजही तितक्याच प्रखरतेने जाणवते. त्यांचे भाषण म्हणजे प्रत्येक शब्द स्पर्श करणारा, विचार करणाराच असा आजही निघत असतो. नुसत्या टाळ्या मिळवणे हे त्यांना कधीही जमले नाही. शास्त्र शुध्द विचारसरणीची परिणामकारक मांडणी करणारे तसेच टीका करणाऱ्यास मुद्देसुद प्रत्युतर देणे त्यांना

फारच साधते हे आजही दिसून येते. शंकानिवारण, निरसण करण्यात त्यांची आजही एवढ्या वयात दिसून येते. मतभेद न वाढविता, सर्वांना समान भूमिकेवर एकत्र आणण्यात ते आजही तेवढ्याच तत्परतेने दिसून येतात. कार्याला चालना देण्याचे महत्वपूर्ण व वैशिष्ट्यपूर्ण म्हणावे लागले. " कोणतेही कार्य हाती घेतले तर त्यात यशस्वी झाल्याशिवाय ते रहात नाहीत हे आजही दिसून येते. गंभीरपणाच्या खडकांतून खळाळून वाहणारा हा अवखळपणाचा झरा बघितला की, त्यांच्या प्रसन्नं व मोकळ्या अंतःकरणाची साक्ष पटते."

श्री गोविंदभाईंच्या जीवनाचे अनेक पैलू कांही तर विशेष असे सांगतात त्यांच्या सानिध्यात कांही वेळ काढल्यास दिसून येते. त्यांच्या बुध्दीची विशालता, एखादी व्यक्ती एका कार्यक्षेत्रात व्यक्त करुन श्रेष्ठपद मिळविते. तीच बुध्दी तिने दुसऱ्या कोणत्याही क्षेत्रात व्यक्त करून श्रेष्ठपद मिळविते. तीच बुध्दी तिने दुसऱ्या कोणत्याही क्षेत्रात प्रगट केली तेवढीच श्रेष्टता त्या व्यक्तीस मिळू शकते हे भाईंच्या एकंदरीत कार्य पध्दतीतून दिसून येते.

श्री गोविंदभाई यांच्या समवेत अनेक लेखक, कवी, साहित्यीक, शिक्षणतज्ञ, पत्रकार, संपादक संस्थापक व संस्थाचालक असे तरी त्यांना त्यांच्याच भाषेत, शब्दात समर्पक उत्तरे देऊन त्यांचे मत परिवर्तन करुन ते आपल्या कार्याकडे वळतांना दिसतात.

श्री गोविंदभाई यांच्या समवेत कार्य करणारे खासदार स्व. भाऊसाहेब वैशंपायन, श्री ज.रा. बर्दापूरकर, श्री बापुसाहेब गोलटगांवकर, श्री बापु साहेब काळदाते, श्री पु. बा. जोशी, जुने नवे आमदार, खासदार, मंत्री, इत्यादी आजही त्यांना मानतात. त्यांच्या कार्याबद्दल गौरोवोद्गार काढतात. त्यांच्याकडे जाणारी प्रत्येक व्यक्ती

त्यांच्या विचारांच्या अथांग सागरात मनसोक्त डुंबतांना आजही दिसतात.

श्री गोविंदभाईंनी वैधानिक विकास मंडळ, ब्रॉडगेज, मराठवाडा जनता विकास परिषद, स्वामी रामानंद तीर्थ संशोधन संस्था, पिपल्स एज्यूकेशन सोसायटी नांदेड, मराठी साहित्य परिषद, अशा अनेक संस्था आणि मंडळावर त्यांनी कार्य करुन प्रभूत्व मिळविले. मराठवाडा जनता विकास परिषदेद्वारे त्यांनी अनेक कार्य यशस्वी रित्या हाताळले. केंद्र सरकार आणि राज्य सरकार यांच्याशी संपर्क साधण्याचे ते एक माध्यम म्हणू सुजान नागरिकांनी ओळखल्यामुळे बरीचशी कामें त्यांच्या नावार करण्याचेही कांहीनी साधले. अनेकांना त्यांनी योग्य असे मार्गदर्शन केलेले आहे व आजही ते करीत असतात.

साक्षरता अभियानात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. सरकार सर्व तोपरी मदत करीत आहे. महाराष्ट्रात अनेक टिकाणी, अनेक जिल्ह्यातून निरक्षरांना साक्षर करण्याचे कार्य मंद गतीने चालत असले तरी मराठवाड्यात ते जोमाने चालत आहे. औरंगाबाद जिल्ह्यात श्री गोविंदभाईच्या मार्गदर्शनाखाली श्रीयुत भाईसाहेबांचे योगदान मराठवाड्यातील ग्रंथालय चळवळीला लाभले याचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. ही गोष्ट ग्रंथालय प्रेमी, कार्यकर्ते आणि महाराष्ट्र राज्य ग्रंधालय महासंघ, महामंडळ, आणि ग्रंथालय संचालनया याच्या मनात असलेले विचार वाचावयास आनंद वाटेल. स्वामी रामानंद तीर्थ संशोधन संस्था औरंगाबाद येथील सुसज्य ग्रंथालय उच्च शिक्षण घेणारांचे भांडारच म्हणावे लागेल. तुम्ही जर संशोधन करणारे असाल तर ह्या ग्रंथालयास अवश्य भेट द्याल. श्री गोविंदभाई हे ग्रंथ प्रेमी, वर्तमान पत्रातील सूक्ष्म निरक्षण करणारे तत्वज्ञानी म्हटल्यास

अतिशोयक्ती होणार नाही. ''ग्रंथ माझे गुरु'' श्री गोविंदभाईंनी मनोमन जाणले आहे. संपादकाची भूमिकाही श्री गोविंदभाईंनी वठविली होती.

हैद्राबाद येथून निघणारे एक वर्तमान पत्र त्यांनी स्वतः काढले होते. मराठवाड्यातील ग्रंथालयीन चळवळीत मोलाचा वाटा म्हणावा लागेल. शिक्षण आणि ग्रंथ यांचा अतूट संबंध आदरणीय भाई चांगलेच ओळखून आहे. वाचनाची आवड निर्माण करावी लागते. लहानपणा पासून बाल वाङ्मय, मासिके, चित्रमय जगत मुलांचे मासिक, गोकूळ मासिके, अर्ध साप्ताहिके मुलांनी वाचावीत म्हणून सर्वांनी प्रयत्न करावेत ही त्यांची इच्छा आहे. वाचनाची आवड, गोडी, ग्रंथालयातील संदर्भ हे गुण त्यांनी अंगी लावून घेतले. त्याचाच परिपाक म्हणून मराठवाड्यात अनेक ठिकाणी ग्रंथालये आणि वाचनालये कार्य करीत आहे. सुसज्ज ग्रंथालये ही देवाण-घेवाण करणारी आहेत हे जाणले आहे. प्रत्येक पुस्तके ते स्वतः वाचतात आणि स्वामी रामानंद तीर्थ संशोधन संस्थेत त्याचा संग्रह करीत असतात. श्री भाई सारखे त्याचा संग्रह करीत असतात. श्री भाई सारखे चालते बोलते ग्रंथ हे समाजास मार्गदर्शन करु शकतात. वाचनाची आवड हा उपजत गुणवत्ता वाढविणे शक्य होई शकत नाही. ग्रंथ संदर्भ पुस्तके ही माणसाला उच्चपदीही नेऊ शकतात हे त्यांच्यावरून दिसू येते.

मराठवाड्यात ग्रथालयाची, वाचनालयाची संख्या वाढत आहे. त्याचा सर्वांनी लाभ घेऊन वैचारिक पातळी उंचाविण्याचा प्रयत्न करावा. अनेक लेखक, साहित्यिक, पत्रकार आणि प्राध्यापक, अध्यापक ह्यांना ग्रंथातून, जे मिळते ते इतरापर्यंत पोहचविण्याची शक्ती निर्माण होत असते. आजचा विद्यार्थी हा दिशाहीन न बनता चांगल्या प्रकारे पायावर उभा राहू शकेल असे शिक्षण ग्रंथातून मिळते.

ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी ग्रंथ लिहिला. त्यातील एक तरी ओवी वाचली तरी वैचारिक पातळी उंचावते. अशाच प्रकारे भाईंच्या बाबतीत म्हणावे लागले. श्री गोविंदभाईंची भूमिका ही हंसाची आहे, नीर-क्षीर ह्यातील फरक त्यांनी बालपणापासून अवगत केली. आज अनेक लोक आपल्या घराचा, कुंटुंबाचा विचार करीत असतात. तसे भाईंचें नाही. त्यांचे ह्या कामात बारकाईने लक्ष देणे चालू आहे. प्रत्येक गावागावातून शेतकरी, कष्टकरी, कामगार यांना शिक्षणाच्या माध्यमातून स्वतःचा व्यवहार कळण्यास मदत होऊ लागली आहे. अनेकांना मशागत, पिकाची आवश्यक ती माहिती मिळविण्यास सुलभता निर्माण झाली. कृषी विद्यापीठ परभणी येथे साक्षरता अभियानातून प्रशिक्षणाद्वारे सांगण्याचे उपक्रम चालू केला आहे. भारताबाहेरील राष्ट्रे ज्या पध्दतीने शेती करून उत्पादन वाढवितात त्यांचे प्रशिक्षण घेण्यास अनेक कृषीतज्ञ, संशोधक गेले आहेत. त्यांच्या कडून ह्या साक्षरांना सोप्या भाषेतून ज्ञान दिले जात आहे. ह्या बाबत श्री गोविंदभाई यांचे मार्गदर्शन मिळविण्यास तेथील अधिकारी सतत संपर्क साधत असतात. त्यांना कोणत्याही विषयाबद्दल केव्हांही प्रश्न विचारणारे लोकही कांही कमी नाहीत. त्याचे उत्तर देण्यापूर्वी ते माणसाची सहनशक्ती, आकलनता, समजण्याची प्रवृत्ती, तो कोणत्या पध्दतीने प्रश्न विचारतो ह्याकडे लक्ष देऊन ऐकतात. हे त्यांचे वैशिष्टे म्हणावे लागले.

त्यांच्याशी जेंव्हा जेंव्हा कोणी बोलत असेल तर असामान्य प्रश्नांना उत्तर देतांना मी अनुभवलेले आहे. भाईना शिक्षणा विषयीची तळमळ तर त्यांना चैन बसून देत नाही. त्याच प्रमाणे मराठवाड्याचा अनूशेष कसा भरून काढला जाईल, ह्याचा तर त्यांनी आपले विचार शासनापर्यंत पत्राद्वारे, निवेदनाद्वारे, शिष्टमनंडळाद्वारे पोहचविण्याचे

कार्य त्यांनी केले. मराठवाडा जनता विकास परिषदेची स्थापना केली. त्यावेळी मराठवाड्याच्या कानाकोपऱ्यातून जनतेची उत्साही वृत्तीचे दर्शन होतांना दिसले. मेळावे, सभा, चर्चा आणि आकडेवारी ह्या वर त्यांनी भर दिला. अनेक ठराव मंजूर करून महाराष्टातील विदर्भ, पश्चिम महाराष्ट्र आणि मराठवाडयातील अनुशेषाची दरी दाखवून दिली.

श्री गोविंदभाई यांच्यातील गुणांची तुलना एका महान योगी पुरुषाचीच म्हणावी लागेल. स्वातंत्र्य मिळविणे हा त्यांचा तरुणपणातील उपक्रम व ध्यास म्हणावा लागेल. स्वातंर्त्र्यपूर्व काळातील त्यांचे समान विचारी मित्र एकत्र आल्यामुळे स्वातंत्र्य संग्रामात एकमेकांचे हात धरून उडी घेता आली. त्यामुळे निजामाला नंमते घ्यावे लागले. त्यांच्या बरोबर असणारे त्यांचे सहकारी मदत करीत होते. अनेक जण हुतात्मे झाले. ज्यांनी कोणत्याही फळाची अपेक्षा केलेला नव्हती. आज त्याच स्वातंत्र्य सैनिकांची पुढील पिढी मात्र त्यांच्या सत्कारकार्याचे फळ चाखीत आहेत. त्यावेळी त्यांनी कमविले कांहीच नव्हते, पण आज न कमविता त्याचा लाभ घेत आहेत. ज्यांनी देहाची, शरीराची संसाराची काळजी देखील केली नव्हती त्यांच्या कार्याची पुढील पिढी निश्चितच सद्उपयोग करुन घेईल यात तीळमात्र शंका नाही. आज गोविंदभाईंनी ८७ व्या वर्षात पदार्पण केले असले तरी त्यांची कार्य करण्याची, वेळेचे बंधन पाळण्याची खरोखर कमाल समजली जाते. तरुणपणातील जिद्दीपणा आजही तेवढ्याच उमेदीने कार्य करण्याची पध्दत नव तरुणांना प्रेरणा व स्फूर्ती देत राहील. श्री गोविंदभाई हे आज कोणतेही काम असो त्याला ते नाही म्हणत नाहीत. हे जाणकरांच्या लक्षात येते. निःस्वार्थीपणा, निर्व्यसनी, निरागस प्रेम,

शब्दाला किंमत देणारे सदासर्वदा विचार करुन पुढील पाऊल टाकणारे गोविंदभाई चलचित्राप्रमाणे सहजरीत्या डोळ्या समोरुन जातांना दिसतात.

विशेष महत्वाचे म्हणजे दिलेला शब्द, वेळ, तारीख ते कधीही बदलन नाही. मग ऐनवेळी कुणाचा सत्कार असो, किंवा महत्वाचा कार्यक्रम असो, तुम्ही म्हणाल ते स्वीकारीत नाहीत. त्यांच्या कार्यक्रमात बदल होणे शक्य नसते. ह्यावरुन भाईंचा करारीपणा, दिन दर्शीकि प्रमाणे कार्य करण्याची पध्दत, समयसुचकता वक्तशीरपणा, शीस्त, स्पष्ट वक्तेपणाच्या जोरावर श्री गोविंदभाई आज पर्यंत आपली प्रतिमा विधात्याच्या आज्ञेनुसार व घालून दिलेल्या नियमानुसार कार्य करीत आले आहे. हे कुणीही मान्य करील. अनेक जण त्यांच्या " मनमें लगन पक्का इरादा " ह्याकडे आकर्षित होतांना दिसतात दि. २४ व २५ मे ९७ रोजी मराठवाडा जनता विकास परिषदेचे अधिवेशन धाराशीव (उस्मानबाद) जिल्ह्यातील उमरगा येथे संपन्न झाले. त्यात श्री गोविंदभाईनी अनेक प्रश्नावर चर्चा घडवून आणली त्यात प्रामुख्याने मराठवाड्यातील पाणी प्रश्न, रेंगाळलेली पाटबंधारी प्रकल्प सुरु करणे, अशा गोष्टी चर्चिल्या गेल्या. ३७१ (२) कलमाचा पाठलाग करण्यात त्यांचा खरोखरच सिंहाचा वाटा म्हणावे लागेल. वैधानिक विकास मंडळामुळे अनुशेष भरुन जाईल ह्याकरीता सर्वतोपरी प्रयत्न केलेले आहेत. हे कुणी नाकारु शकणार नाही. कोणतीही गोष्ट करण्याचे, त्याचा पाठपुरावा करण्याचे त्यांचे धोरण स्वागतार्ह व निश्चितच फलदायी स्वरुपाचे म्हणावे लागेल.

महाराष्ट्र शासनाने शैक्षणिक धोरण राबविण्याचे ठरविले तेंव्हा अनेक बैठका घेण्यात आल्या, शैक्षणिक परिषदा स्थापण्यात आल्या.

त्याचा परिणाम महाराष्ट्र आणि मराठवाडयात कांही ठिकाणी श्री गोविंदभाई च्या कार्याची प्रशंसा होतांना दिसत होती. तर कांही ठिकाणी शैक्षणिक कार्याचे मुल्यमापन करणे कठीणच म्हणावे लागले. प्रौढांना साक्षर करणे, त्यांना शेतीच्या कामात साक्षर करणे, त्यांना शेतीच्या कामात साक्षरतेचा उपयोग पटवून देणे हे कार्य ते गेल्या ५ वर्षापासून करीत आले आहेत. त्यांच्या जीवनातील अनेक प्रसंग हे रोमांच उठविणारेच म्हणावे लागतील.

श्री नारायणराव चव्हाण यांनी गोविंदभाईच्या परिचयाचे सुरेख वर्णन केले आहे. १९२६ साली त्यांचा परिचय झाला. श्री गोविंदभाई व त्यांचे धाकटे बंधू श्री गोपाळभाई हे एकाच प्रकारचा पोषाख करीत असत. पिवळ्या रंगाचा कोट, मखमली तांबडी टोपी पांढरे धोतर ह्यामुळ ही जोडी उठून दिसत असे. इंग्रजी शिकविण्याकरीता कर्वे गुरुजीच असावेत असा अट्टाहास धरला गेला. त्यांच्या प्राचार्याच्या कानी ही गोष्ट गेली. श्री अहमदऊल्ला ह्यांनी अब्दुलहक यांच्या कडे तक्रार केली. त्यांच्यावर दंडात्मक कारवाई केली गेली तेंव्हा इंग्रजीच्या तासाला ह्या विद्यार्थ्यांनी बहिष्कार घालण्याचे ठरविले. श्री नारायणराव चव्हाण आणि भाई ह्यांनी फोटो काढण्याची कला अवगत केली. ते उत्तम आर्टिस्ट झाले. फोटो ग्राफिचा क्लास ते करीत असत. करमणूक व मनोरंजन म्हणू ते सायकलीवरुन प्रेक्षणीय स्थळे पहात फिरत असत. हैद्राबाद हायकोर्ट, उस्मानियाँ हॉस्पिटल, अफजल गंज, सिटी कॉलेज, चार मिनार फलक नुमा पॅलेस ह्याचे फोटोही त्यांनी काढले होते. विद्यार्थी दशेतच ते राजकारण आणि समाजकारण ह्याकडे वळले गेले होते. त्यांच्या मध्ये मैत्री करण्याची, वाढविण्याची कला होती. त्यांना निवेदन लिहिण्याची सवंय पूर्वी पासून जडली गेली होती. आजही

त्यांची निवेदने मुद्देसूद आणि मनाचा ठाव घेणारीच असतात हे प्रत्येकजण सांगू शकेल. स्व. श्री चंद्रगुप्त चौधरी हेही मोगलाई ते स्वराज्य मिळविण्याचा प्रर्यंत ते त्यांच्या सहवासात होते. एवढेच नव्हे तर जीवनाचा शेवट होईपर्यंत भाईच्या सानिध्यात राहण्यात त्यांना आनंद वाटत असे. अविचल निष्ठा, सचोटी व त्याग हे गुण त्यांनी आत्मसात केले होते. श्री सी. डी. चौधरीनी कम्युनिष्ट पक्ष स्वीकारला तर श्री भाऊसाहेब वैशंयायन यांनी पंडित जवाहरलाल नेहरु यांचे नेतृत्व मान्य करुन काँग्रेस पक्षा मध्ये दाखल झाले, परंतु भाईंनी महाराष्ट्र परिषदेचे कार्य चालू ठेवले. श्री गोविंदभाई च्या स्वभावात इतरांचे ऐकूण घेणे, समजून घेण्याची शक्ती आजही दिसून येते. त्यांना हेवेदावे, वाद विवाद ह्या गोष्टीचा तिटकारा असल्याचे आजही दिसून येते.

श्री गोविंदभाई ह्यांनी खादी आणि ग्रामोद्योग व शिक्षण क्षेत्रात व अनेक संस्थाशी सलोख्याचे नाते आजही आहे.

श्री विनायकराव चारठाणकर यांची भेट महाराष्ट्र परिषदेत परतूर येथे झाली. श्री गोविंदभाईचे विचाराची छाप त्यांच्यावर पडली गेली. त्याच परिषदेत शिक्षण हे मराठी भाषेतून असावे सरकारी नोकरीत प्रमाणशीर प्रतिनिधीत्व, राज्यकारभारातील अन्याय, जनतेवर होणारे अन्याय ह्या गोष्टी श्री गोविंदभाई ह्यांनी तळमळीने मांडल्या होत्या. किसानांचे प्रश्न, लेव्ही, विणकरांचे प्रश्न ह्यावर संघर्षाचे लढे त्यांनी दिले. निजामी अन्यायाचा प्रतिकार करण्याची त्यांची मानसिक तयारी संघटना ऊभी करु शकली. मराठवाड्यात क्रातीकारकांचा मोठा संच तयार झाला होता. श्री गोविंदभाईच्या प्रेरणेमुळे विद्यार्थी, गुमास्ता, हमाल, मजदूर स्त्रियाच्या संघटना स्थापन होत गेल्या. तेलंगण आणि कर्नाटकात ही त्यांनी आपल्या परिषदेचे कार्य चालविणे हे श्री

चारठाणकर यांनी पाहिले, अनुभवले. त्यांच्यात प्रखर ध्येयवाद, क्रांतीकारी व विषमता विरोधी व गरीब जनतेच्या कार्यक्रमासाठी अहोरात्र झटणारे थोर पुरुष व कर्मयोगी म्हणून ते आकर्षिले गेले. श्री गोविंदभाईचा संबंध महाराष्ट्रातील थोर विचारवंताशी जसा होता. तसाच इतर राजकीय पुढारी आणि नेत्यांचा ही होता. या शेख अब्दूल्लाचाही सहवास त्यांना घडला होता.

वैधानिक दृष्टीकोन तयार करण्याच्या दृष्टीने त्यांनी बरेच प्रयत्न केले अध्यापन आणि अध्यापक ह्याकडे त्यांचे आजही बारीक लक्ष आहे. आजच्या शिक्षणात अभ्यास पुरक शिक्षण दिले जावे, व्यवसायांचे शिक्षण दिले जावे असा आजही त्यांचा प्रयत्न सुरु आहे. श्री गोविंदभाई यांचे म्हणणे असे आहे की, श्रध्दा असावी, स्वार्थापलिकडे जाऊन जे कार्य केले जाते त्यात सामर्थ्य निर्माण होण्यास मदत होते. ''चढेल तो पडेल'' पण चढण्याचा प्रयत्न जीद्द कायम ठेवावी म्हणजे यश येते. असे ते आजही सांगत असतात. निराशा त्यांच्याजवळ आजही फिरकत नाही. सामाजिक जीवन जगावयाचे असेल तर कांही काळ तरी त्यांच्या सहवासात राहणे आवश्यक आहे. श्री ज.रा. बर्दापूरकर ह्यांनी तर श्री गोविंदभाई कोणत्याही कामास अग्रम दिलेला होता. आपल्या हातातील काम सोडून त्यांच्या कामाला ते अधिक प्राधान्य देत आले आहेत.

श्री गोविंदभाई व आ. कृ. वाघमारे यांचा प्रेरणेने ''मराठवाडा'' दैनिकासाठी एक ट्रस्ट स्थापन करण्यात आला. श्री श्री गोविंदभाई अध्यक्ष आ. कृ. वाघमारे संस्थापक आणि अनंतराव भालेराव संपादक म्हणून काम पहात होते. मराठवाड्याचा अंक हा अग्रलेख मुळे हायसा वाटत असे. अग्रलेखावरुन सत्य परिस्थितीतीची जाणीव श्री अनंतराव

यांनी प्रत्येक वेळी करण्याचे प्रयत्न केले.

श्री स. मा. गर्गे ज्यांनी इतिहासाची पाने सहजरितीने लिहून सामान्य जनतेवर आपला ठसा उटमविला होता. त्यांच्यावर श्री गोविंदभाईच्या विचारांची छाप पडली होती. स. मा. गर्गे यांना राजकीय व सामाजिक विचारांची प्रेरणा मिळत गेली.

श्री रतिलाल जरीवाला ह्यांनी श्री गोविंदभाई ह्यांच्यापासून लोक जागृतीचे धडे घेतले.

श्री गोविंदभाई यांच्याबद्दल कै अनंतराव भालेराव यांनी शिक्षण आणि शिक्षक यांच्या बद्दल मनोरंजनात्मक वर्णन केले आहे. त्यावेळी काळे गुरुजी त्यांना गणित व इंग्रजी शिकवित असत. श्री काळे गुरुजी अत्यंत कडक शिस्तीचे शिक्षक होते. सायकल जा ये करीत. श्री गोविंदभाईनीही सायकलवर जाणे येणे सुरुच केले. श्री काळे ज्या प्रमाणे सायकलवर ताठ बसून जात त्याच प्रमाणे श्री श्री गोविंदभाईनीं त्यांच्या पावलावर पाऊल ठेवले होते. त्यांनी काळ, काम, वेगाचे गणित प्रत्यक्षरित्या अनुभवले व सोडविले. चारित्र्य घडविले जाते ते चरित्रे वाचूनच हेच श्री गोविंदभाईंनी केले. त्यांनी कार्लमार्क्स, लेनिन, ट्राटस्की, टॉलस्टॉय, रास्कीन, गांधी, रॉय यांची चरित्रे वाचली व सहकाऱ्यांना वाचावयाची गोडी निर्माण केली. ज्यामुळे कॉंग्रेसचा इतिहास, राष्ट्रवाद, लोकशाही, समाजवाद, गांधीवाद आदींची तोंडओळख होत गेली. श्री गोविंदभाई हे त्यावेळी नुसते शिक्षक नव्हते तर इतरापूसन वेगळे होते. त्यांनी जे ज्ञान प्राप्त करुन घेतले होते. त्याची कल्पना आज विचारवंत सुध्दा संभ्रमात पडू शकेल . त्यांच्याबद्दल भीतियुक्त आदर वाटत असे आणि आजही त्यांना काय विचारावयाचे हे समजून उमजून बोलावे लागते.

श्री गोविंदभाई, महात्मा गांधी यांना कित्येक वेळा भेटले होते. गांधीजीनी सत्याग्रह बंद पाडल्यामुळे भाईंचा राग अनावर झाला. त्यानंतर त्यांनी गांधीजीच्या विचाराचा सखोल अभ्यास केला व आपणच कांही चुकलो आहोत हे त्यांनी कबूल केले. त्यांनतर त्यांनी गांधीवादाकडे आपले पाऊल उचलले. कला आणि शास्त्र ह्यांचा त्यांनी उपयोग केला. तत्पूर्वी शस्त्र आणि अन्यायाची चीड ह्याकडे लक्ष केंद्रित केले होते. श्री गोविंदभाईचां स्वभाव, वागणूक ही निर्मळ आणि निर्भेळ आहे. "पानी तेरा रंग कैसा, जिसमें मिलाये वैसा" त्यामुळे ते कोणीही असो त्यात रमलेले दिसतात. पूर्वीही अनेक जेष्ठ, श्रेष्ठ विचारवंत, कार्याला वाहून घेणारे होते, परंतु श्री भाईचे त्यावेळी समाधान झाल्याचे न दिसता त्यांना पुढील कार्य जोमाने चालू ठेवण्याची सूचना देत असतात. आपले कार्य पूर्ण झाले असले तरी ते केंव्हा बंद पडेल ह्याकडे ते लक्ष वेधून घेतात.

मराठवाड्याचे मागासलेपण त्यांना सतत आव्हान देत असते. महाराष्ट्रातील विकासाची तुलना ते जेव्हां करतात. तेव्हा मराठवाड्यातील अनुशेष त्यांना दिसतो. पश्चिम महाराष्ट्राचा विकास हा ज्यांप्रमाणे होत गेला. त्याच प्रकारे मराठवाड्याचा विकास होण्याबद्दल त्यांनी अनेक वेळा निवेदने, शिष्टमंडळे केंद्र आणि राज्य सरकारकडे नेली. तेंव्हा शासनाने मराठवाडा वैधानिक विकास मंडळ स्थापन केले. महाराष्ट्राच्या विकासाचा तुलनात्मक अभ्यास केला. त्यांनी गोळा केलेली माहिती खरोखरच चिंतनीय असून मराठवाड्याचा विकास दूर करण्याची चिंता त्यांना आजही आहे. प्रा. श्री. विजय दिवाण यांनी त्यांचे वर्णन मार्मिक शब्दात केले आहे. घरातील एक व्यक्ती असल्याचे वाचण्यात आले. श्री गोविंदभाईनां डोंगराची उपमा

दिली आहे. डोंगराच्या जवळपास झरे, श्री भाईच्या कृश शरीराबद्दल, रागीट वाटणारा गंभीर चेहरा, जाड भिंगाचा चष्मा, धोतर, शर्ट, त्यातून त्यांचे पायी चालणे हे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. श्री भाई हे गांधीवादी असल्याचे स्पष्ट होते, कारण महात्मा गांधी यांना पायी चालणे आवडत होते. आजही दोन्ही व्यक्तिंना डोळ्यासमोर उभे केले तर गांधी आणि भाई यांच्या संथपणे चालण्याचा निश्चितच भास होऊ शकेल. श्री गोविंदभाई ना वेळेचे, तारखेचे बंधन जणू पूर्वी पासून चिकटलेले आहे. त्यांच्या दररोजच्या कार्यक्रमात इतरांच्या कार्यक्रमांना वाव मिळत नाही. हे एका अधिवेशनावरुन स्पष्ट झाले आहे. कार्यक्रमाचा जो वेळ ठरलेला आहे त्यावेळी ते हजर असतात. नाही तर इतर व्यक्तींमध्ये पायी चालणे, वेळेचे बंधन, कार्यक्रमाचे स्वरुप ह्या कुडे दुर्लक्ष असल्याचे दिसून येते. विमान उशीरा येणे, अधिकारी वर्गाचा आदेश ह्यामुळे इतरांना जमत नसावे असेच वाटते. दिवसातून किती कार्यक्रम असावेत हे ठरलेले नसते. एखादा कार्यक्रम तुमच्या अध्यक्षतेखाली, प्रमुख पाहुणे म्हणून व्हावा ही इतरांची इच्छा व भावना भरीस घालतात. पण भाईचें तसे नाही. कितीही दुखत असले तरी ते तेथे हजर होतात हे प्रत्यक्ष अनुभवले आहे.

१९६२ साली विधान सभेची निवडणूक लढविणारे भाई डॉ. रफिक झकेरिया यांच्याशी लढले. पण त्यांच्यातील विचार, कार्य ह्याला मतदारांनी नाकारल्याचेच दिसून आले. निवडणूकीत जिंकले कोण हरले कोण ह्याचा कौल जनताच देत असते. पण श्री भाईसाहेबासारखे कार्याला वाहून घेणारे फार थोडे लोक आहेत, पण जनतेला त्यांचे मोल कळू नये ही दुर्दैवी बाब म्हणावी लागले. लोकांचे कल्याण आणि हीत हे त्यांच्या अंगी असल्याचे दिसून येते.

श्री भाईंनी श्री सरस्वती भुवन शिक्षण संस्थेची भव्य इमारत उभी केली. त्यांनतर महाविद्यालये, शारदा मंदिर-कन्या हायस्कुल वसतिगृहे यांच्या स्वंतंत्र्य इमारती उभ्या करुन दिल्या. विकासाबरोबर च संस्थेची देखभाल करणे याला श्री भाईनी अग्रक्रम दिला. श्री मराठे यांच्या मार्गदर्शनाखाली इमारतीची उभारणी केली. गोलाकार स. भु. हायस्कुलची इमारती समोर सिमेंटचे वळणदार अशी सुबक कलाकृती उभी केली. शारदा मंदिरची इमारतही त्यांच्याच मार्गदर्शनाखाली उभी राहिली. श्री मराठे यांची हातातील छडी इमारतीला वळण देत असे. तीच छडी, श्री मराठे यांची देहयष्टी, आजही डोळ्यासमोर उभी रहाते. श्री गोविंदभाईसाहेब हे सर्वांना मार्गदर्शक तर आहेच, त्याच प्रमाणे इतरांचेही ऐकूण घेऊन त्यातील हंसवृत्ती प्रमाणे ते घेतात, हे विशेष म्हणावे लागेल.

श्री गोविंदभाई हे मराठवाड्याचे नेते म्हणून ओळखले जातात. स्वातंत्र्य लढा आणि नंतर शिक्षण क्षेत्रात कार्य करण्याची त्यांची तयारी वंदनीयच म्हणावे लागले.

१९७३-७४ मध्ये बिहारचे आंदोलन झाले, त्यावेळी औरंगाबाद येथून श्री गोविंदभाई, अनंतराव भालेराव, डॉ. बापूसाहेब काळदाते, प्रा. म. द. पाध्ये , प्रा. दि. श्री. बोरीकर, रमणभाई पारीख इयादी पुण्याला गेले. ह्या कार्यक्रमाचे नेतृत्व श्री गोविंदभाईडे होते. श्री लोकनायक जयप्रकाश नारायण ह्यांच्या विचारांचाही त्यांच्यावर परिणाम झाला होता. रेल्वे रोको आंदोलन करण्यांत श्री गोविंदभाई अग्रेसर होते. श्री गोविंदभाईनां श्री अनंतराव भालेराव सारखे विचारांचा प्रचंड साठा असणारे त्यांच्या बरोबर होते. त्यांच्या मध्ये एकी होती. पुण्याला जेवढे गेले होते, तेवढेच परत येण्यास निघाले होते. त्यांच्या

गाड्याही दोन होत्या. एक बिघडली तेंव्हा इतरांनी त्यांना पुढे निघण्यास सांगितले परंतु त्यांनी स्पष्ट नकार दिला. गाडी दुरुस्त झाल्यावर दुसऱ्या दिवशी सकाळी ते औरंगाबाद कडे निघाले. इतरांना पुढे जाण्यास सांगितले परंतु श्री गोविंदभाईच्या स्वभावाचे दर्शन घडताच सर्वांना एकत्रच निघायचं ठरविल. श्री गोविंदभाई ह्यांना समस्या, प्रश्न सोडविण्यात जो आनंद वाटतो पळवाटा काढण्याची त्यांना मुळीच सवंय नव्हती आणि आजही नाही. प्रश्न कसे सुटतील ह्याचाच विचार त्यांच्या मनात घोळत असतो. नेतृत्व करणे म्हणजे कांही सोपी गोष्ट नाही. चालढकल करण्याची त्यांच्या मनातही येत नाही. श्री भाईंचा स्वभाव हट्टी आहे. हे म्हणणे चूक आहे. माणसाला जेव्हा कोणती गोष्ट करावयाची असेल ती पूर्ण केलीच पाहिजे. अर्धवट सोडता कामा नये हे त्यांनी मनोमनी आंगिकारले होते. आपली भूमिका योग्य व स्वच्छ असेल तर इतरांशी तडजोड करणे त्यांना जमत नाही. मराठवाड्यातील रेल्वे आंदोलन १९७४ साली झाले. सर्वत्र आंदोलनाकरिता सत्याग्रह करण्याचे ठरले तेव्हा श्री गोविंदभाई स्वतः नेतृत्व स्वीकारले. सत्याग्रह केला. त्यावेळी औरंगाबादमध्ये संचार बंदी होती. शिस्तबध्दपणे सत्याग्रह झाला. इतर सत्याग्रहींना कोणत्याही प्रकारचा त्रास होऊ नये म्हणून त्यांनी काळजी घेतली. त्याकरीता एस. टी. बसची व्यवस्था केली. तेंव्हाच भाईंना बरे वाटले.

श्री गोविंदभाई हे व्यवहारात भावनेला थारा न देता कठोरपणे वागत असतात. तरीही मित्रांच्या आणि जिव्हाळ्याच्या माणसाची ते आस्थेवाईक पणे चौकशी करून कुशल विचारतात. श्री भाईंनी अनेक समवयस्क, कमी वयांचे लोक मृत्यूला सामोरे जातांना पाहिले. त्यांना होणारे दुःख इतरांना जरी कळू शकलेले नाही, तरी त्यांच्या आत्म्याला,

मनाला कांहीशा वैचारिकता मानसिकता सांगत असते. त्यांचा धीर गंभीर चेहरा सांगत असतो, हे माणसा, तू ह्या जगातून गेला असला तरी तुझे राहिलेले काम आम्ही पूर्ण करणार आहोत. हे त्यांचा चेहरा, डोळे सांगत असतात.

त्यांनी अनेकांना साश्रू नयनांची निरोप दिलेला आम्ही पाहिला. त्यात स्वामी रामानंद तीर्थ, कै. अनेतराव भालेराव, डॉ. ख्रिस्चन, श्री, दत्तोपंद देशपांडे बोडखेकर, श्री निवासराव बोरीकर, तसेच कांही प्राध्यापक तर कांही जुन्या पिढीतील शिक्षक ज्यांनी भाईच्या शब्दाला कधीही पडू दिले नाही.

श्री स. भु. कला व महाविद्यालयातील एक हिंदीचे प्राध्यापक भगवान दासजी वर्मा ह्यांनी तर त्यांचे वर्णन मोठ्या मार्मिक शब्दात केलेले आहे. कर्म करीत करीत शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी. कर्माचा लोप होऊन देण्यासाठी अन्य कोणताच मार्ग नाही. श्री वर्मा हे स. भु. शिक्षण संस्थेत १९६३ साली नोकरीस लागले. त्यावेळी कला, वाणिज्य विज्ञान हे एकाच महाविद्यास जोडलेले होते. त्यावेळी वर्मा हे प्राध्यापक म्हणून काम करु लागले. त्याच्या स्वभाचाचा त्यांनी अभ्यास केला. त्यांनी कल्पना मांडली की, त्याचा विस्तार करणे, त्यातून सरळ आणि सोपा मार्ग काढणे. ह्या गोष्टी आजही करतांना दिसतात. आपले काम आपण प्रसन्न चित्ताने आणि तल्लीन होऊन करावे. त्यात शिथिलता येऊ देऊ नये. कोणत्याही मोहाला बळी पडू नये. त्यामुळे कामाच ओझ वाढत असत. काम मन लावून कराव पण त्याची आसक्ती धरी नये. बालपणासून भाई झगडत राहिले ते स्वातंत्र्य मिळविण्यापासून, मराठवाड्याचा विकास घडविण्या पर्यंत. त्यांनी शस्त्रे पाहिली, शास्त्रे पाहिली, त्याचा अभ्यास केला, प्रात्याक्षिके

केली. शरीर प्रकृती धड धाकट असतांना शस्त्राचा उपयोग केला. आज ते शास्त्राचा उपयोग करुन समस्या सोडवित असतांना दिसतात. त्यांनी जे कार्य हाती घेतले असेल ते पूर्ण करीत रहतात, मग तुम्ही त्यांच्या बरोबर असा किंवा नसलात तरी ते तुम्हाला म्हणणार नाही. त्यांचे कार्य चालूच राहते.

श्री. वि. कृ पांडे ह्यांनी भाईंचे वर्णन आचरणात गांधीवादी, विचाराने समाजवादी, दैनदिन जीवनात आणि दिनचर्येत तत्ववादी केले आहेत. भाईच्यां मनाचा मोठेपणा, वैचारिक पातळी, गुण ग्राहकता असे विविध पैलुंनी त्यांना एकाद्या तत्वज्ञानाच्या भांडारात नेऊन बसविले आहे असे वाटते.

मराठवड्याची उन्नती, व विकासांचा ध्यास हे श्री पांडे यांनी प्रत्यक्ष अनुभलले आहे. श्री पांडे अर्थशास्त्रज्ञ तसेच सरकारचे आर्थिक सल्लागार व भारतीय विदेश व्यापार संस्थेच निवृत्त संचालक म्हणून होते. त्यामुळे त्यांनी भाईंच्या आर्थिक व्यवहार, विकासाचा अभ्यास, तुलनात्मक दृष्टिकोन हे जवळून पाहिले आहेत. १९६२-६३ मध्ये मराठवाडा विकास परिषदेतील कांही प्रसंग त्यांनी अनुभवले होते. भाईची सर्वांगीण विकासाची पोडतिडीक, आणि समाजवादी विचारांची दृष्टि हे ऱ्हदयाचा ठाव घेणारे म्हणावे लागतील.

श्री गोविंदभाईंनी आर्थिक विकासाच्या दृष्टिने योजनाबध्द लढा चालू केलेला आहे हे कुणीही नाकारु शकणार नाही. महाराष्ट्राच्या तुलनेत मराठवाडा किती मागास आहे. हे १९७३ मध्ये श्रीमती इंदिरा गांधी यांना निवेदनद्वारे दाखवून दिले. मराठवाडा मागासलेला आहे हे त्यांनी त्यात दाखवून दिले. मराठवाडा मागसलेला आहे हे त्यांनी त्यात दाखवून दिले. दरडोई उत्पन्नाचा आधार त्यांनी घेतला आहे. १९५५-५६ साली महाराष्ट्राचे २९२ रूपये तर मराठवाड्याचे १७४ रुपये होते.

१९६८-६९ साली महाराष्ट्राचे ६९२ झाले तर मराठवाड्याचे ४२५ रुपये असे होते. मराठवाड्याचा विकास व्हावा म्हणून त्यांनी औद्योगिक विकास, विद्युत पुरवठा, शेती, दुष्काळग्रस्त भाग, रस्ते आणि रेल्वे वाहतुक या क्षेत्रात भरीव निधी उपलब्ध करुन देण्याची मागणी केली होती. एवढेच नव्हे तर सरकारी कर्मचाऱ्यांची कशी उपेक्षा झालेली आहे.

श्री गोविंदभाई यांनी शिक्षण संस्था संचालकाचे अध्यक्ष, सदस्य म्हणून काम केले आहे. त्याच प्रमाणे सर्व थरातील, स्तरातील लोकांचा विचार केला आहे. मराठवाड्याचे मागसलेपण दूर करुन समतोल प्रादेशिक विकास व्हावा. अशी विनंती वेळोवेळी मराठवाडा जनता विकास परिषदेच्या माध्यमातून महाराष्ट्र आणि भारत सरकारला निवेदने देऊन केली आहे. आजही त्यांची मागणी कायम आहे. आजही त्यांची मागणी कायम आहे. राज्यघटनेचा कलम ३७१(२) चा आधार घेऊन स्वायत्त वैधानिक विकास मंडळाची मागणी सफल केली. तरीही अद्याप ह्या कलमाचा पाठपुरावा ते सतत करीत असतात.

धर्म निरपेक्षता, राष्ट्रीय एकात्मता, सामाजिक समता आणि विभागीय असमतोल या प्रश्नाचे त्यांनी घेतलेले संदर्भ महत्वाचे आहेत. विचार आणि कार्य हे त्यांच्यातील विशेष गुण म्हणावे लागतील. माजी गृहमंत्री व मुख्यमंत्री श्री शंकररावजी चव्हाण यांनी तर श्री गोविंदभाई हे एक स्वच्छ, नितळ अशा चारित्र्याचे आहे अशा शब्दात वर्णन केले आहे. श्री गोविंदभाई व श्री शंकरराव चव्हाण हे हैद्राबाद मध्ये राहत असतांना सायकल चोरीची घटना घडली. परंतु ती सायकल आपल्याकडून चोरी गेली म्हणून त्यांनी आपल्या खिशातून किंमत पक्षाच्या कार्यालयात भरली. म्हणजेच चारित्र्याची निष्ठा येथे दिसून येते. हे जरी शुल्लक कारण असले तरी मनाचा मोठेपणाच म्हणावे

लागेल. ते मराठवाड्यात जन्मले, मराठवाड्यात रमले, मराठवाड्याच्या विकासाकरीता अहोरात्र प्रयत्न करीत राहिले आणि आजही कार्यरत आहेत हे मराठवाड्याचे भाग्यच म्हणावे लागेल. लोकांत जागृती निर्माण करण्यात ते यशस्वी झाले असे म्हणावे लागे ल. श्री गोविंदभाईना आणीबाणीच्या काळात अटक करण्सासंबंधी श्री शंकररावांना श्रीमती इंदिरा गांधी यांनी विचारणा केली, परंतु त्यांच्या कडून लोकशाही किंवा देशाच्या ऐक्याला धोका निर्माण होणार नसल्याचे त्यांना कळविले गेले. यावरुन हे सिद्ध होते की, जनतेचा विकास व्हावा म्हणून त्यांची धडपड, तसेच लोकशाही व राष्ट्रीय ऐक्य अबाधित रहावे म्हणून त्याचा सर्वतोपरी प्रयत्न हे सामंज्यस्याचे धोरण म्हणावे लागेल. श्री भाईंना काम कोणी केले हे महत्वाचे वाटत नसून त्याची फलनिष्पत्ती कोणत्या पायरीवर आहे हे जाणून घेतात. त्यांचे समाधान हे काम पूर्ण झाले असे न म्हणता त्याला पूर्ण करुन त्याला पुढे चालू ठेवीत राहावे.

श्री गोविंदभाई यांनी प्राथमिक शिक्षण सुधारले गेले पाहिजे म्हणून जे प्रयत्न केले त्याचा परिपाक म्हणून मराठवाड्यात शिक्षणाचा आमुलाग्र बदल होत आहेत. श्री गोगटे, संचालक, भारतीय शिक्षणशास्त्र संस्था पुणे यांनी १९६४ साली श्री भाईच्या शिक्षणाची तळमळ पाहिली. त्यांच्या पुढे हे जणू आव्हानच कळत न कळत उभे राहिले. श्री भाईची भेट विद्यापीठात झाली, तेव्हा त्यांचे विचार ऐकण्यात आले. १९७५ मध्यें विद्यापीठाच्या कामानिमित्त त्या दोघाची भेट झाली आणि समवयस्क, समविचारी, दोघातील शिक्षणाची आस्था, सखोल अभ्यास ह्यापुढे ते जवळ येत गेले. प्राध्यापकाच्या पगार थकण्यावरुन जी गोष्ट घडू नये ती घडली. श्री गोविंदभाई व्यवस्थापनातील अडी अडचणी आर्थिक परिस्थितीची चर्चा करुन त्यांचे समाधान केले.

१९७९ साली स्वामी रामानंद तीर्थ आणि भारतीय शिक्षणशास्त्र संस्था पुणे ह्यांच्या विद्यमाने मराठवाड्यातील शिक्षणावर तपशील गोळा करण्यात आला. त्यात श्री गोगटे यांना ह्या कामाची जबाबदारी सोपविण्यात आली. श्री भाईच्या बरोबर काम करण्याचा त्यांना मनस्वी आनंद झाला. त्यांचा सहवास हा त्यांना महत्वाचा वाटला त्यांनी गरवारे महाविद्यालात प्राचार्य म्हणून जाण्याचा बेत रद्द केला. संशोधन करणे व मराठवाड्यात शिक्षणाचे सार्वत्रिकरण होणे गरजेचे आहे. हे त्यांना दिसून आले. संशोधक हे पी. एच. डी. पुरते नसावे तर त्यांनी शिक्षणाकडे लक्ष दिले पाहिजे. त्याच प्रमाणे संस्थेकरीता त्यांनी पैसा जमा करुन तो ठेवीच्या रुपाने ठेवला. पैशाचा हिशोब चोख ठेवणारे भाई श्री गोगटे हे यांना संभ्रमात पडल्यासारखे वाटले. त्यांनी हाच पैसा बँकेत ठेवून त्याचा विनियोग स्वामी रामानंद तीर्थ संशोधन संस्था चालविणास आज करीत आहेत. संस्थेत प्रत्येक पुस्तक, ग्रंथ, संदर्भ पुस्तके मिळण्याची सोय त्यांनी करुन ठेवली आहे.

स्वातंत्र्य मिळून ५० वर्षे झाली असल्यामुळे सुवर्ण महोत्सव वर्ष साजरे करण्यांत येत आहे. अभिमानाची गोष्ट आहे ती म्हणजे श्री गोविंदभाईना सुवर्ण महोत्सव समितीवर सदस्य म्हणून मा. श्री. मुख्यमंत्री मनोहरराव जोशी यांनी घेतले आहे. मराठवाड्याचेच ते भूषण नसून संपूर्ण भारताचे ते पदमविभूषण ठरले आहेत. त्यांच्या बद्दल दोन शब्द लिहिण्याचे मी धाडस केले ते योग्य की अयोग्य हे वाचकच ठरवतील.

त्यांच्या जीवनातील आनंदाचे, दुःखाचे क्षण टिपण्याचा प्रयत्न केला आहे. हे पुस्तक निश्चितच बालकांना, पालकांना, शिक्षक संस्था चालकांना, प्राध्यापक अध्यापकांना, शिक्षिकांना आणि त्यांच्या बद्दल आपुलकी असणाऱ्यांना आवडेल यात तीळ मात्र शंका नाही.

